**श्री.सं.दि.मानकर, उप संचालक, बाष्पके यांच्या सह संचालक, गट-अ, बाष्पके या पदावरील पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र.बाष्पके-१०१७/प्र.क्र.४४/कामगार-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक- १४ मार्च, २०२३.

वाचा:- १) समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२९ सप्टेंबर, २०१८.
२) समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२० नोव्हेंबर, २०१८.

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये, श्री.सं.दि.मानकर, उप संचालक, बाष्पके यांना सह संचालक, गट-अ, बाष्पके या पदावर पदोन्नती देण्यात येऊन त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना नागपूर येथे करण्यात आली होती. त्यानंतर संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सदर पदस्थापनेत बदल करून श्री.मानकर यांची पदस्थापना सोलापूर येथे करण्यात आली. श्री.मानकर हे पदोन्नतीच्या पदावर रूजू झालेले नाहीत.

२. शासनाच्या दि.२०.११.२०१८ च्या आदेशाविरूद्ध श्री.मानकर यांनी, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज क्र. १०३८/२०१८ दाखल केला होता. सदर प्रकरणी, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दि.२९.३.२०१९ च्या आदेशान्वये शासनाचे उपरोक्त नमूद दि.२०.११.२०१८ चे आदेश रद्द करून शासनाच्या दि.२९.९.२०१८च्या आदेशानुसार त्यांची पदस्थापना दोन आठवड्यात करण्याचे आदेशित केले.

३. मा.न्यायाधिकरणाच्या दि.२९.३.२०१९ रोजीच्या आदेशाच्या पार्श्वभूमीवर पुढील कार्यवाही करण्याकरीता मुदतवाढ देण्याच्या अनुषंगाने शासनाने मा.न्यायाधिकरणात संकीर्ण अर्ज (M.A.) क्र.२०६/२०१९ दाखल केला. सदर संकीर्ण अर्जप्रकरणी मा.न्यायाधिकरणाने दि.१६.४.२०१९ रोजीच्या आदेशान्वये न्यायाधिकरणाच्या दि.२९.३.२०१९ रोजीच्या आदेशाची अंमलबजावणीकरीता दोन आठवड्यांची मुदतवाढ दिली.

४. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या दि.२९.३.२०१९ रोजीच्या अंतिम आदेशाविरूद्ध शासनामार्फत विधि व न्याय विभागाच्या मान्यतेने मा.उच्च्ा न्यायालयात स्वतंत्र रिट याचिका क्र.६९५७/२०१९ दाखल करण्यात आली आहे. या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दि.३०.०१.२०२३ रोजीच्या आदेशाद्वारे शासनाने दाखल केलेली रिट याचिका क्र.६९५७/२०१९ खारिज केलेली असून मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या दि.२९.०३.२०१९ रोजीच्या आदेशाची अंमलबजावणी दोन आठवड्यात करण्याबाबत आदेश दिलेले आहेत.

५. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या दि.३०.०१.२०२३ रोजीच्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे शासनाच्या वतीने पुनर्विचार याचिका (क्र.RPW/६१०४/२०२३) दाखल करण्यात आली आहे

६. प्रस्तुत आदेशान्वये, रिट याचिका क्र.६९५७/२०१९ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या दि.३०.०१.२०२३ रोजीच्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या पुनर्विचार याचिकेवरील (क्र.RPW/६१०४/२०२३) निर्णयाच्या अधीन राहून, श्री.मानकर यांच्या सह संचालक, सोलापूर या पदावरील पदस्थापनेशी संबंधित संदर्भाधीन क्र.२ चा दि.२०.११.२०१८ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे. तसेच, श्री.सं.दि.मानकर, सह संचालक, बाष्पके यांची पदस्थापना "सह संचालक,नागपूर" या पदावर करण्यात येत आहे.

७. सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१९.११.२०१६ अन्वये घोषित करण्यात आलेले नियुक्ती प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३१४१८३५०४४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2023.03.14 18:39:38 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई.
२) श्री.सं.दि.मानकर, सह संचालक, बाष्पके (द्वारा:-संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई-५१).

**प्रत:-**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई.
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) सर्व सह संचालक, बाष्पके संचालनालय (द्वारा:- संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई-५१).
७) सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२, कार्यासन-१६ब, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-३२.
8) निवड नस्ती.